मौजे बाभळी, ता. दर्यापूर, जि. अमरावती येथील संपादित जमीनीचा भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम २८अ नुसार वाढीव मोबदला अदा करण्यास्तव निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. मावेजा-२०२४/प्र.क्र. ८०/र-१२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक- ०३ मार्च, २०२५

वाचा -

१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. अ.क.वा./न्यायप्रकरण/१०९९/प्र.क्र.१५२/अ-२, दि. २४/१२/२००३
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र.:-बीयुडी-२०१८/प्र.क्र.६७/ब-१, दि. ९/३/२०१८
३) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र क्र. पूर-पुनर्व/अका/कावि/३२४/२०२४, दि. १८.०६.२०२४

**प्रस्तावना :-**

पुनर्वसन भूसंपादन प्रकरण क्रमांक ९/४७/२००८-०९ मौजे बाभळी ता. दर्यापूर जि. अमरावती मध्ये भूधारक म. शाकीर म. जाफर यांनी कलम २८ अ अंतर्गत वाढीव मोबदला मिळण्याकरीता न्यायालयात रिट याचिका क्र.५८३६/२०१७ दाखल केली होती. सदर याचिकेमध्ये दि.१३.११.२०१९ रोजी निकाल पारित झालेला आहे. त्या अनुषंगाने विशेष भूसंपादन अधिकारी तथा उपविभागीय अधिकारी, दर्यापूर यांनी सदर प्रकरणात दि. १४.०७.२०२० रोजी कलम २८-अ अंतर्गत निवाडा पारित केला आहे. त्या अनुषंगाने सदर संपादित जमिनीचा वाढीव मोबदला अदा करण्याबाबत जिल्हाधिकारी, अमरावती यांच्याकडून संदर्भाधीन क्र. ३ येथील पत्रान्वये निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भूसंपादन प्रकरण क्रमांक ९/४७/२००८-०९ मौजे बाभळी ता. दर्यापूर जि. अमरावती मध्ये भूधारक म. शाकीर म. जाफर यांना कलम २८ अ अंतर्गत वाढीव मोबदला अदा करण्यास्तव जिल्हाधिकारी, अमरावती यांनी मागणी केल्याप्रमाणे रक्कम रूपये २०,४२,४९७/- (अक्षरी रुपये वीस लक्ष बेचाळीस हजार चारशे सत्यान्नव फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीवरील खर्च भागविण्यासाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना रूपये २०,४२,४९७/- (अक्षरी रुपये वीस लक्ष बेचाळीस हजार चारशे सत्यान्नव फक्त) इतका निधी BEAMS प्रणालीवर निधी उपलब्ध करून देण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागार तथा सह सचिव, मदत व पुनर्वसन/कक्ष अधिकारी (म-११), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी करावी.

३.	भूसंपादन प्रकरण क्रमांक ९/४७/२००८-०९ मौजे बाभळी ता. दर्यापूर जि. अमरावती मध्ये भूधारक म. शाकीर म. जाफर यांना कलम २८ अ अंतर्गत वाढीव मोबदला अदा करण्यासाठी सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये २०,४२,४९७/- (अक्षरी रुपये वीस लक्ष बेचाळीस हजार चारशे सत्यान्नव फक्त) एवढा निधी "मागणी क्र.सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२-पूर चक्रीवादळे, (९३) इतर (९३) (०३) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, घरे इ. बांधकामासाठी संपादन केलेल्या/अधिग्रहित केलेल्या जमिनीबद्दल नुकसानभरपाई देणे (अनिवार्य), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ ०१८२)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, अमरावती यांना खालील अटींच्या अधीन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी भूधारकास अदा करण्यासाठी परिगणना केलेली वाढीव मोबदला रक्कम अंतिम व योग्य असल्याची खातरजमा करुन, उपलब्ध करुन दिलेली उपरोक्त रक्कम भूधारकास तात्काळ अदा करावी.

२) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी मा. न्यायालयाच्या निर्णयानुसार वाढीव मोबदला मंजूरीचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

३) अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबींवर अनुदान खर्च होणार नाही यांची विभागीय आयुक्त यांनी दक्षता घ्यावी.

४) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला निधीपेक्षा जास्त निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

५) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account/ PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

६) सदरच्या आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

७) या संदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास सादर करण्यात यावा. उपरोक्त निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास सादर करावीत.

८) संबंधित अधिकारी यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

९) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर

आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account/PLA (स्वीय प्रपंजी खाते) मध्ये जमा करुन ठेवण्यात येणार नाही याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

१०) सदर आदेशात नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनूसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नंतर या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादी कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक ३९७/२०२४/व्यय-९, दि. ३०.०८.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतिक क्रमांक २०२५०३०३१२३५०३५७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2025.03.03 12:36:09 +05'30'

**(संजय जगताप)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रक अधिकारी (पुनर्वसन), अमरावती
२. उप आयुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती
३. जिल्हाधिकारी, अमरावती
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, मुंबई /नागपूर
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) -१/२, मुंबई /नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
७. महसूल व वन विभाग कार्यासन ब-१/ अ-४/पीएसी/ म-११, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती र-१२

****